रादलोव

# चित्रकथा



प्रगती प्रकाशन
मॉस्को





एकदा एका पुलावर
झाली दोन बोकडांची जोरदार टक्कर



आणि खाली डोके वर पाय करून
पडले नदीत दोघे चक्कर !

माझी बाळं कुठायत?



माझी छकुली ती माझी सोनुली ती!



अगबाई अगबाई माझी बाळं कुठं?
ही काळुंद्री नव्हेत माझी सोनुली कुठं?

# तोचि मित्र ओळखावा!









"बदकांनो, अरे मित्रांनो, मला सफरीला
नेता ?" ससुल्या म्हणाला.



बदकांच्या पाठीवर तळ्यातल्या सफरीला
पहिल्यांदा आली खूप मज्जा,



पण झाली जेव्हा बदकांच्या जेवणाची वेळ
तेव्हा उडाला ससुल्याचा फज्जा !







कोंबडीच्या एका पिलाने गाठले एक बदकू,
दुसऱ्या पिलाने गाठले दुसरे बदकू,

तिसऱ्या पिलानेही गाठले एका बदकूला,
आणि कोंबडीने लाडीगोडी केली बदकाशी.

एरवी ओढा ओलांडणे गोष्ट नव्हे सोपी,
नशीब जोरावर असताना कामे होतात
चुटकीसरशी !







शिकस्तीचे प्रयत्न करून कितीही कमरा कसा—
तुमच्या गळाला कधीच लागणार नाही हा
मासा .



माझा भाऊ नि मी असे दोघे निघालो भटकायला,
अचानक दिसली एक अळी आम्हाला.



घातली आम्ही झडप त्या वळवळणाऱ्या अळीवर,
मारल्या टोची, घेतले चिमटे, घातली रूंजी क्षणभर.



"दोघे मिळून खेचू या," केला मनाशी विचार,
पण पुढच्याच क्षणाला सारा झाला घात,



मी झालो बहिरा नि भाऊ बनला आंधळा,
उंदिरमामाच्या शेपटीने केला ब्रह्मघोटाळा!

दोन मांजरे आणि एक चिमणी







"चिव चिव चिव,"
चिवचिवते चिमणी
बसून झाडाच्या बुंध्यावर.

"पाहते गंमत
या दोन मांजरांची
घडवून जोरदार टक्कर."





"तो माझा आहे!"   "मुळीच नाही!"



"होयच मुळी!"   "नाहीच मुळी!"



अर पण भाडण करून उपयोग काय ?

## गंमतीचा खेळ



आहे की नाही खेळ गंमतीचा ?
गेंड्याला वाटतो जमतीचा.

पहा कसा नेटाने बसतो
चुकले नेम सोडून टाळ्यापिटतो.



"ससुल्या ससुल्या मार खाली उडी,
चाखायची असेल तर गाजराची गोडी!"

"धावरू नकोस आई आलो एका क्षणात
उंचावर असलो तरी बघ येतो एका दमात!"

## बॉबी आणि माशी



मऊसऊ गादीच्या खुर्चीवर
बॉबी घोरत होता घुर्रर्र घुर्रर्र.



अचानक आली एक माशी
गूं गूं करीत तिने बॉबीची झोप मोडली खाशी.



बॉबी रागाने
झेपावला माशीवर,



पण माशी बेटी होती
बॉबीपेक्षा बेरकी बहाद्दर.



अखेरीस गेली माशी, भुणभुण तिची थांबली
अरेच्चा इकडे या मूर्खाने गडबड कसली केली ?



केल्या उद्योगाचा प्रताप त्याला भोवला
त्याच खुर्चीवर बॉबीचा बूमरँग झाला !



एके सुंदर सकाळी साळिंदर निघाले
दूरच्या प्रवासाला.



विश्रांतीला त्याने अंमळ पाठ टेकली
शेजारच्या धोंडयावर पडशी टाकली.



दुसऱ्या सकाळी चमत्कार की हो घडला
—साळिंदरला समजेना धोंडा वर कसा गेला!

डिकला आवडेल खायला कोंबडी



खाल्ली पाहिजे ती चवदार कोंबडी.



अरेच्चा कुणी केली अशी लबाडी!



अस्से चवदार जेवण मिळणार माझ्या आवडीचे,
थांबा मित्रांनो, पळू नका कारण नाही घाईचे !



शब्द एकही आमच्या मित्रांनी वाया
नाही घालवला,
ठोकली धूम तात्काळ घालून विळखा कमरेला.



गडगडत जाऊन त्यांनी खालचे तळे गाठले,



अस्वलमामा बिचारे हात चोळीत बसले !

पन्नासदा विचार करा, बांधण्यापूर्वी झोपाळा, नाही तर बघता बघता कापला जाईल गळा







हुषार पिल्लू



जो भुंकतो खूप



आणि भांडतो खूप,



जेवणाऐवजी त्यांच्या पदरात पडेल धूप !

## चेंडू कुठे आहे?



छोटा चेंडू घरंगळला,



आणि घरंगळत घरंगळत पुढे निघाला,



अखेर इतका धावला की दिसेनासा झाला.



तुम्हाला मला समजले त्या चेंडूचे काय झाले,
पण मांजरीचे पिल्लू मात्र डोक्याला
हात लावून बसले.



"पळा, पकडा ती टोपी



आणि आणा इकडे."



कुत्र्यांनी आज्ञा पाळली,
पण टोपीचे झाले तुकडे.



साळिंदर सुस्कारून म्हणाले :



"अरे राम पिट्टा पाडणार माझा हे काम."



पण जेव्हा तुम्ही वापरता अक्कल



वाचतात तुमचे श्रम बक्कळ !



छोटे साळिंदर रडत म्हणाले:
“अग आई ग पाय माझे दुखले!”



पण आता स्वारी आहे खुशीत–
जाईल मैलच्या मैल टिंगून ऐटीत.